गट-ब (अराजपत्रित) व गट- क संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या बदली, पदस्थापना याबाबत शिफारस करण्यास नागरी सेवा मंडळाची स्थापना करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**दिव्यांग कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक:दिव्यांग-२०२४/प्र. क्र. १२/दि. क. ०४,**
तिसरा मजला, अे-विंग, मित्तल टॉवर,
नरिमन पॉईंट, मंत्रालय, मुंबई-४०० ०२१
दिनांक:- १४ मार्च, २०२४.

**वाचा:-** १) शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग दिनांक १५ डिसेंबर, २०२२.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दिनांक ३१ जानेवारी, २०१४.

**प्रस्तावना:-**

सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १५ डिसेंबर, २०२२ रोजीच्या अधिसूचनेव्दारे दिव्यांग कल्याण विभाग हा स्वतंत्र विभाग निर्माण करण्यात आला आहे.

२. सामान्य प्रशासन विभागाच्या वाचा-२ येथील शासन निर्णयानुसार शासन सेवेतील गट-अ, गट-ब व गट-क मधील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारस करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करण्याबाबत प्रशासकीय विभागांना सूचना दिलेल्या आहेत. दिव्यांग कल्याण विभागाच्या अधिनस्त असलेल्या क्षेत्रीय स्तरावर कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांच्या बदली, पदस्थापना याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारस करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

दिव्यांग कल्याण विभागांतर्गत येणाऱ्या क्षेत्रीय कार्यालयात कार्यरत असलेल्या गट-ब (अराजपत्रित) व गट- क संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या बदली, पदस्थापना याबाबत शिफारस करण्यासाठी खालीलप्रमाणे नागरी सेवा मंडळाची स्थापना करण्यात येत आहे:

| | | |
|---|---|---|
| १ | **प्रधान सचिव / सचिव, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई** | **अध्यक्ष** |
| २ | **सह सचिव / उप सचिव सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई** | **सदस्य** |
| ३ | **सह सचिव / उप सचिव (दि. क. ४), दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई** | **सदस्य** |
| ४ | **अवर सचिव / कक्ष अधिकारी (दि. क. ४) दिव्यांग कल्याण विभाग मंत्रालय, मुंबई** | **सदस्य सचिव** |

२. गट-ब (अराजपत्रित) व गट-क संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या बदल्या/पदस्थापना बाबतचे प्रस्ताव सादर करताना पुढीलप्रमाणे कार्यवाही करणे आवश्यक राहील:

अ) बदल्यांबाबत शिफारशीसाठी प्रस्ताव नागरी सेवा मंडळ (१) समोर ठेवताना महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम २००५ मधील तरतुदीनुसार कार्यवाहीबाबत वस्तुस्थिती तसेच प्रस्तावित बदल्यांबाबतची पार्श्वभूमी / वस्तुस्थिती निदर्शनास आणणे आवश्यक राहील.

ब) बदलीसाठीच्या प्रस्तावावर नागरी सेवा मंडळ (१) कडून शिफारस झाल्यावर महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियमातील तरतूदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यास मान्यतेसाठी सादर करावा.

क) बदल्यासंबंधीच्या प्रस्तावावर महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम २००५ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करणे बंधनकारण राहील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१४१६३९०९६४३५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ADHIKRAO BAPU BUDHE

Digitally signed by ADHIKRAO BAPU BUDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PERSONS WITH DISABILITIES WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=e9b3afc989167fcd7f4487809755a2a08c37958a70b01ce9dd6139bffb1e6896, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6DD8309934E3A186F9E32AB2ED268A322FA2805ECBD838D076066AA8F4668BC0, cn=ADHIKRAO BAPU BUDHE
Date: 2024.03.14 16:51:16 +05'30'

**( अधिकराव बा. बुधे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मंत्री, दिव्यांग कल्याण यांचे खाजगी सचिव
मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई
अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग /कार्यासन-१२
सचिव, दिव्यांग कल्याण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई
आयुक्त, दिव्यांग कल्याण आयुक्तालय, पुणे
सर्व कार्यासने, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती दि.क.४